शासन सेवेत पदोन्नतीसाठी इतर मागासवर्ग
प्रवर्गातील कर्मचाऱ्यांना जात प्रमाणपत्राची पडताळणी
करुन वैधता प्रमाणपत्र सादर करण्याबाबत......

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन परिपत्रक क्र.सीबीसी १०/२०१०/प्र.क्र.५९०/मावक-५,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: ८ जून, २०११.

वाचा :-१) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय
क्र.सीबीसी १०/२०१०/प्र.क्र.४७/मावक-५, दिनांक २६ मार्च,२०१०.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.बीसीसी २००९/
प्र.क्र.२१९/कार्या-१६-ब, दिनांक ०५ नोव्हेंबर,२००९.
३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय
क्र.सीबीसी १०/२००४/प्र.क्र.५७०/मावक-५, दि.१६ मे, २००७.
४) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन परिपत्रक
क्र.सीबीसी १०/२००४/प्र.क्र.५७०/मावक-५, दिनांक ०५ मार्च,२००५.
५) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय
क्र.सीबीसी १२/२००२/प्र.क्र.२५२/मावक-५, दिनांक २५ जाने.,२०००

प्रस्तावना :- अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गाच्या उमेदवारांना शासन सेवेत, निमशासकीय सेवेत, शासन अंगीकृत संस्थांमध्ये पदोन्नतीपुर्वी जाती प्रमाणपत्राची पडताळणी करुन वैधता सादर करण्याबाबत मार्गदर्शक सूचना उपरोक्त संदर्भाधीन क्र.४ च्या शासन परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आल्या आहेत. संदर्भाधीन क्र.३ चे शासन निर्णयान्वये पदोन्नतीपुर्वी जाती प्रमाणपत्राची पडताळणी करुन वैधता सादर करण्याबाबत मार्गदर्शनपर स्पष्टीकरण करण्यात आले होते. तथापि, इतर मागासवर्गीयांना पदोन्नतीमध्ये आरक्षण नसल्याने इतर मागासवर्गातून यापूर्वीच सेवेत लागलेल्या व जात प्रमाणपत्र पडताळणी झाली नसलेल्या उमेदवारांबाबत पदोन्नतीसाठी जात पडताळणी करण्याची आवश्यकता नसल्याचे उक्त शासन निर्णयान्वये सूचित करण्यात आले होते. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ७ मध्ये, *"मागास प्रवर्गाच्या उमेदवारांना नियुक्ती अथवा पदोन्नती देत असतांना जात वैधता प्रमाणपत्र असल्याखेरीज या पुढे नियुक्ती अथवा पदोन्नती देण्यात येऊ नये."* असे आदेश परीत करण्यात आले आहेत. त्यास अनुसरुन शासन परिपत्रक दि.०५.०३.२००५ मध्ये दि.२६.०३.२०१० च्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली. इतर मागासवर्ग प्रवर्गातून पदोन्नती मिळणाऱ्यांबाबत या विभागाचा दिनांक १६.०५.२००७ चा शासन निर्णय तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ०५.११.२००९ च्या परिपत्रकातील आदेश, यामुळे सदर प्रवर्गातील उमेदवारांमध्ये जाती वैधता प्रमाणपत्राच्या अनुषंगाने संभ्रम निर्माण झाल्याने याबावत सुस्पष्ट अशा सूचना पारित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन परिपत्रक:- शासकीय/निमशासकीय इ. सेवेतील पदोन्नतीसाठी इतर मागासवर्ग प्रवर्गातील अधिकारी / कर्मचारी तसेच अनुकंपा तत्वावर, संप कालावधीत अथवा अन्य निवड प्रक्रियेतून शासकीय /

निमशासकीय इ. सेवेत नियुक्त झालेले अधिकारी / कर्मचारी यांना त्यांचे जात प्रमाणपत्राची पडताळणी करुन वैधता प्रमाणपत्र सादर करण्याबाबत खालीलप्रमाणे सूचना नव्याने देण्यात येत आहेत :-

१) इतर मागासवर्गातील जे अधिकारी / कर्मचारी अनुकंपा तत्वावर, संप कालावधीत अथवा अन्य निवड प्रक्रियेतून शासकीय/निमशासकीय इ. सेवेत नियुक्त झाले असतील व अशा अधिकारी /कर्मचाऱ्यांची इतर मागासवर्गीयांकरिता आरक्षित असलेल्या पदांकरिता नियुक्ती झालेली नसेल अथवा खुल्या प्रवर्गातून इतर मागासवर्गीयांची नियुक्ती झाल्या नंतर अशा अधिकारी / कर्मचारी यांनी इतर मागासवर्गीयांना असणारे फायदे/सवलती मिळविण्याकरिता दावा केलेला नसेल तर, इतर मागासवर्गीयांना पदोन्नतीमध्ये आरक्षण नसल्यामुळे अशा अधिकारी / कर्मचारी यांना पदोन्नतीकरिता जात वैधता प्रमाणपत्राची आवश्यकता नाही. परंतु असे अधिकारी / कर्मचारी कायमस्वरुपी खुल्या प्रवर्गात दर्शविण्यात येत असल्याची खात्री करणे आवश्यक आहे.

२) इतर मागासवर्गातील ज्या अधिकारी / कर्मचारी यांनी इतर मागासवर्गीयांकरिता असलेल्या आरक्षणाचा फायदा घेतलेला नाही, अशा अधिकारी / कर्मचारी यांना खुल्या बिंदुवर दर्शविले असेल तरच त्यांना पुढील पदोन्नतीसाठी, जात प्रमाणपत्राची पडताळणी होऊन ते वैध ठरण्याचे बंधन लागू असणार नाही.

३) आरक्षणाचा लाभ घेतलेल्या वा घेऊ इच्छिणा-या इतर मागासवर्गीय अधिकारी / कर्मचारी यांना जात वैधता प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे आवश्यक आहे. तसेच, अनुकंपा तत्वावर नियुक्त केलेल्या कर्मचाऱ्यांना देखील संबंधित प्रवर्गाच्या बिंदूवर दर्शविण्यात येत असल्यामुळे आवश्यकतेनुसार त्यांना जात वैधता प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे बंधनकारक राहील.

२. सदरहू परिपत्रक शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०६०८११०३५८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( ज.न.राठोड )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.मंत्री/राज्यमंत्री (सामाजिक न्याय व भटक्या विमुक्त जाती व इतर मागासवर्ग) यांचे खाजगी सचिव,
सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई,
सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालयख मुंबई,
सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई,
सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई,
सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई,
सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी/जिल्हादंडाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा/मूळ शाखा) मुंबई,
प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालयाचे खंडपीठ, औरंगाबाद/ नागपूर,
सर्व मंत्रालयीन विभाग व *त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,*
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
सर्व महानगरपालिकांचे आयुक्त,
सर्व मुख्यधिकारी, नगरपरिषदा / नगरपालिका,
सर्व विभागीय जात प्रमाणपत्र पडताळणी समित्या,
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी,
निवड नस्ती